सहायक अनुदानाच्या जलद संवितरण व सनियंत्रणासाठी आहरण व संवितरण अधिकारी आणि अन्य अशासकीय कार्यान्वयन प्राधिकारी यांचेकरीता" आभासी वैयक्तिक ठेव लेखा" Virtual Personal Deposit Account (VPDA) व Single Nodal Agency (SNA) या व्यवस्था व कार्यपध्दती १५ व्या वित्त आयोगास लागु ठरत नसल्याने १५ व्या वित्त आयोगांतर्गत प्राप्त होणाऱ्या अनुदानास सन २०२२-२३ ते २०२५-२६ या कालावधीकरीता एक विशेष बाब म्हणून सूट देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बियुडी-१३२५/प्र.क्र.८९ /आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत

नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

दिनांक : २५ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-** (१) शासन निर्णय वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११०/२०२३/कोषा प्रशा-५, दिनांक १४/०२/२०२४.

(२) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. संकीर्ण-१०२४/प्र.क्र.३२६/आरोग्य-७, दिनांक १९/०६/२०२४.

(३) संचालक (वित्त व लेखा) यांचे पत्र क्र.राआसोम/१५ वि. आ./नि.वि./९३२७९-२८५/२०२४-२५, दिनांक १३/०२/२०२५

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्र. (१) येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारितील आयुक्त, आरोग्य सेवा कार्यालयातील आहरण व संवितरण अधिका-यांना आणि अन्य अशासकीय कार्यान्वयन प्राधिका-यांना महाराष्ट्र कोषागार नियम नमुना क्र.४४ देयकाद्वारे राज्याच्या एकत्रित निधीतुन २७ - लहान बांधकामे, ३१- सहायक अनुदान (वेतनेतर), ३३ - अर्थ सहाय्य, ३५- भांडवली मत्तेच्या निर्मिती करीता अनुदान, ५० - इतर खर्च, ५३ - मोठी बांधकामे आणि वित्त विभागाद्वारे वेळोवेळी घोषित करण्यात येतील अशा अन्य उद्देष शिर्ष (Object Head) अंतर्गत आहरीत केल्या जाणा-या सहाय्यक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी "आभासी वैयक्तिक ठेव लेखा" (Virtual Personal Deposit Account) ही व्यवस्था व कार्यपध्दती सार्वजनिक आरोग्य विभागाच्या

अखत्यारितील आयुक्त, आरोग्य सेवा कार्यालयास संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेला आहे. त्याअनुषंगाने राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी १५ व्या वित्त आयोगांतर्गत मंजुर अनुदानास SNA व VPDA लागु नसल्याने सदर अनुदान वितरीत करण्यासाठी विशेष बाब म्हणून सन २०२२-२३ ते २०२५-२६ या कालावधीकरीता केंद्र शासनाकडून मंजूर होणाऱ्या अनुदानासाठी SNA व VPDA मधून सुट देण्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. त्याअनुषंगाने वित्त विभागाने SNA व VPDA मधुन सुट देण्याबाबत विभागाच्या प्रस्तावास मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी १५ व्या वित्त आयोगांतर्गत मंजुर अनुदानास SNA व VPDA लागु नसल्याने सदर अनुदान वितरीत करण्यासाठी विशेष बाब म्हणून सन २०२२-२३ ते २०२५-२६ या कालावधीकरीता केंद्र शासनाकडून मंजूर होणाऱ्या अनुदानासाठी SNA व VPDA मधून सुट देण्याबाबत मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.७३/२०२५/को.प्र.५, दिनांक २४/०२/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२५२०३१०१७७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2025.02.25 21:07:11 +05'30'

**(राजेंद्र वि. कुडले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- २, नागपूर.

३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. संचालक (वित्त व लेखा) राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
७. अति. संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
८. प्रशासकी अधिकारी, आरोग्य सेवा, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.सर्व जिल्हा शल्य चिकित्सक,
११.सर्व उपसंचालक, परिमंडळे
१२. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद.
१३.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४.वित्त विभाग ( अर्थसंकल्प/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१५.नियोजन विभाग (कार्यासन १४८१) मंत्रालय, मुंबई.
१६.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई
१७.निवडनस्ती ( आरोग्य -७) .